3

20140819154435482З

**यवतमाळ जिल्ह्यातील दत्तापूर, ता. कळंब येथील पर्यटन स्थळाच्या विकास आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक टीडीसी २०११/३/प्र.क्र.१९८/पर्यटन,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक - १७ फेब्रुवारी, २०१२.**

**संदर्भ:- जिल्हाधिकारी, यवतमाळ यांचे पत्र क्र. नियो/जिनिस/वि.वै./का-५/२६/२०११, दि. २१/०३/२०११**

**शासन निर्णय :** पर्यटन स्थळाच्या ठिकाणी पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी प्रादेशिक पर्यटन योजने अंतर्गत रुपये १८०००.०० लाख तरतूद सन २०११-१२ मध्ये करण्यात आली होती. जिल्हाधिकारी, यवतमाळ यांनी यवतमाळ जिल्ह्यातील दत्तापूर, ता. कळंब येथील पर्यटन स्थळाच्या विकासाच्या रुपये ५६४.३७ लाख इतक्या रक्कमेच्या ढोबळ अंदाजपत्रकाचा सादर केलेल्या प्रस्तावास शासन निर्णय क्रमांक टीडीसी २०११/३/प्र.क्र.१९८/पर्यटन, दिनांक १३/०५/२०११ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. सदर प्रशासकीय मान्यतेपैकी खालील नमूद केलेल्या कामांना सन २०११-१२ मध्ये करण्यात आलेल्या १८०००.०० लाख तरतूदीतून जिल्हाधिकारी यवतमाळ यांना रुपये १७६.३० लाख इतकी रक्कम निधी उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देत आहेत.

**(रुपये : लाखात)**

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजित खर्च | वितरीत निधी | कार्यान्विय यंत्रणा |
|---|---|---|---|---|
| १ | संरक्षक भिंत (देवळाजवळ) | ८९.७६ | ०.०० | विशेष प्रकल्प, सार्वजनिक बांधकाम विभाग यवतमाळ |
| २ | पर्यटन निवास | ७९.४१ | ७९.४१ | |
| ३ | अंतर्गत रस्ते, ड्रेनेज, संरक्षण भिंत | ५९.९२ | ०.०० | |
| ४ | जमीन सुशोभिकरण | ९०.०० | ०.०० | |
| ५ | बागबगीचा सुशोभिकरण | २०.०० | २०.०० | |
| ६ | प्रसाधनगृह व स्वच्छतागृह | १६.८९ | १६.८९ | |
| ७ | किचन व डायनिंग हॉल | ३५.२० | ०.०० | |
| ८ | जुन्या पायऱ्यांचे बांधकाम | ३९.६० | ०.०० | |
| ९ | विश्रामगृह | ४५.०५ | ०.०० | |
| १० | ४ टक्के आकस्मिकता | १९.०३ | ०.०० | |
| ११ | २ टक्के संगणक | ९.५१ | ०.०० | |
| १२ | पाणीपुरवठा | २०.०० | २०.०० | |
| १३ | अंतर्गत पाणीपुरवठा, पाण्याची टाकी | २०.०० | २०.०० | |
| १४ | विद्युतीकरण | २०.०० | २०.०० | |
| | **एकूण** | **५६४.३७** | **१७६.३०** | |

प्रादेशिक पर्यटन योजनेतंर्गत सन २०११-१२ साठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रुपये १८०.०० कोटी एवढया तरतूदीतून वर तक्त्यात नमूद करण्यात आलेली रक्कम रुपये १,७६,३०,०००/- (एक कोटी शहात्तर लाख तीस हजार फक्त) इतकी रक्कम जिल्हाधिकारी, यवतमाळ यांना या शासन निर्णयान्वये अदा करण्यास शासन खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून मंजूरी देत आहे.

**अटी व शर्ती :**

१) सदर कामास निधी उपलब्ध झाल्याशिवाय सुरुवात करु नये व निधी उपलब्ध झाल्यानंतर निधीच्या उपलब्धतेनुसार कामे पुर्ण करावीत.

२) या प्रस्तावाच्या अनुषंगाने सविस्तर अंदापत्रके व आराखडे सादर करण्यात यावीत.

३) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

४) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी जिल्हाधिकारी/कार्यान्वित यंत्रणेवर राहील व जादा खर्च प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

५) ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या कामास तांत्रिक मान्यता घ्यावी.

६) अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

७) उपरोक्त सर्व कामांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता, यापूर्वी घेतली नसल्यास, काम सुरु करण्यापूर्वी प्राप्त करुन घेण्यात यावी. ज्या प्रस्तावांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता देताना काही अटी व शर्ती विहित करण्यात आलेल्या आहेत अशा अटीं व शर्तीची आधी पूर्तता करणे बंधनकारक राहील.

८) योजनेत्तर स्वरुपाच्या कामासाठी (देखभाल/दुरुस्ती इ.) सदरची तरतूद उपयोगात आणली जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

९) या कामास निधी प्राप्त झाल्यानंतर सदर निधीतून होणाऱ्या खर्चातून करावयाच्या कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यत शासनास न चुकता सादर करावीत. तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

१०) सदर काम पूर्ण झाल्यानंतर देखभालाची तसेच इतर अनुषंगिक कामांची जबाबदारी कार्यान्वित यंत्रणेवर राहील.

११) हा शासन निर्णय नियोजन विभाग अनोपचारिक संदर्भ क्रमांक १६३/१४४४ दिनांक १९/१२/२०११ व वित्त विभाग अनोपचारिक संदर्भ क्रमांक १२/२०१२ दिनांक २४/०१/१२ अन्वये सहमतीने व सल्लाने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(आ. बा. डमाळे)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
विभागीय आयुक्त, अमरावती
जिल्हाधिकारी, यवतमाळ
जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हाधिकारी, यवतमाळ
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
नियोजन विभाग (१४४४/१४१२), मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, अर्थसंकल्प, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.